पोलीस विभागातील कर्मचाऱ्यांची आहार भत्त्याची प्रलंबित देयके प्रदान करण्यासाठी रु.२५.०० कोटी इतका खर्च करण्यास पोलीस महासंचालकांना प्राधिकृत करण्यास मंजूरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक : पीएए-०३०९/प्र.क्र.४९५/पोल-५अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : १९ मार्च, २०१०.

वाचा : (१) शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक-पीएए-०३०४/सीआर-१२/पोल-५(अ), दिनांक २१.२.२००४..
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र पोमसं/३३/७१२५/ प्रलंबित आहारभत्ता/२८/२००९, दिनांक १० फेब्रुवारी, २०१०.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्रमांक-पोआ/कक्ष-१४/अर्थसं/श्रश्याना/ पुरवणी अनुदान/१४/२०१०, दिनांक ८ फेब्रुवारी, २०१०.

<u>शासन निर्णय :-</u> अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई व सर्व जिल्हा कोषागार अधिकारी यांना कळविण्यात येते की, पोलीस महासंचालकांच्या अधिपत्याखालील विविध कार्यालयातील व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अधिपत्याखालील पोलीस कर्मचा-यांना द्यावयाच्या प्रलंबित आहार भत्त्यासाठी रु.२५.०० कोटी (अक्षरी रुपये पंचवीस कोटी फक्त) ( रु.२०.०० कोटी पोलीस महासंचालक व रु.५.०० कोटी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई) एवढा निधी सन २००९-२०१० मध्ये वित्त विभागाच्या मान्यतेने खर्च करण्यास पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. हा खर्च मागणी क्रमांक-"बी-१-२०५५ पोलीस" या प्रधान शिर्षाखाली असलेल्या विविध उपलेखाशिर्षाखालील संबंधित उद्दिष्टाखाली मंजूर केलेला रु.२५.०० कोटी निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदरचे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-८२/१०/व्यय-७, दिनांक २.३.२०१० अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सदानंद जाधव )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधीक्षक,
संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
सर्व प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण विद्यालये
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
अधिदान लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती - पोल-५अ.